**अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांच्या अधिनस्त असलेल्या वसतिगृहांच्या इमारत बांधकाम अंदाजपत्रकास व आराखडयास मान्यता देण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्र. शावबां-२००९/प्र.क्र.२८/का.१२
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : ९ फेब्रुवारी, २०१०.

**वाचा** :- १) शासन निर्णय क्र.शावबां-२००९/प्र.क्र.२८/का.१२, दि. २४ एप्रिल, २००९.
२) शासन निर्णय, आ.वि.वि. क्र.शावबां-२००९/प्र.क्र.३२/का.१२, दि १.३.२००९.

**शासन निर्णय** :- अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांच्या अधिनस्त असलेल्या शासकीय आदिवासी मुलांचे वसतिगृह, कोरची व शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, कोरची, जिल्हा गडचिरोली या वसतिगृहांचे अंदाजपत्रक व आराखडे प्रशासकीय मान्यतेसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे सादर केले होते. सार्वजनिक बांधकाम विभागाने सदर प्रस्तावास मान्यता दिली असून संदर्भीय दि.२४ एप्रिल, २००९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

२. सदर अंदाजपत्रके सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहेत. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर अंदाजपत्रकात प्रचलित नियमानुसार भाववाढीसाठी आकस्मिक खर्च संगणक इ. खर्चाच्या बाबी अंतर्भूत करुन प्रशासकीय मान्यतेस सहमती दर्शविलेली आहे. आता सदर वसतिगृहाची अंदाजपत्रकीय किंमत खालीलप्रमाणे मान्य करण्यात येत आहे.

| अ. क्र. | वसतिगृहाचे नांवे | तालुका व जिल्हा | वसतिगृहाची किंमत (रु.लक्ष) |
|---|---|---|---|
| १ | शासकीय आदिवासी मुलांचे वसतिगृह, कोरची | कोरची, जिल्हा गडचिरोली | १७८.०० |
| २ | शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, कोरची | कोरची, जिल्हा गडचिरोली | १७८.०० |

३. सदर वसतिगृहाची किंमत प्रत्येकी रु.२०.०० लक्ष पेक्षा जास्त असल्याने यास चक्रीय पध्दतीने सचिव समितीची मान्यता घेण्यात आली आहे.

४. सदर बांधकामावर होणारा खर्च सन २००९-१० मध्ये वसतिगृह बांधकामासाठी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. शासकीय आदिवासी मुलांचे वसतिगृह, कोरची या वसतिगृहाच्या बांधकामासाठी केंद्र शासनाकडून रु.७७.३५ लाख निधी प्राप्त झाला असून राज्य शासनाचा हिस्सा म्हणून रु.७७.३५ लाख एवढी रक्कम संदर्भीय क्र.२ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेली आहे. शासकीय आदिवासी मुलींचे वसतिगृह, कोरची या वसतीगृहाच्या बांधकामाचा खर्च सन २००९-१० मध्ये वसतिगृह बांधकामासाठी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

५.     सदर शासन निर्णय चक्रीय पध्दतीने सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६.     सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००२०११६३००८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( अ. को. आहिरे )
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
२. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर
३. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली , जि.गडचिरोली.
४. महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र/२, नागपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
७. सचिव (बां) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम (प्रा.) विभाग, नाशिक.
९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, गडचिरोली.
१०. कार्यकारी अभियंता, आदिवासी सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, गडचिरोली जि.गडचिरोली.
११. उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोरची.
१२. कक्ष अधिकारी ( का-६ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. निवड नस्ती (का.१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२